दिनांक : ३१ **मे,** २०११ रोजी
कोषागारातून देय

दिनांक : **१ जून,** २०११ रोजी देय झालेल्या
आयुर्विमा महामंडळाच्या कर्जाच्या हप्त्याची
परतफेड करण्यासाठी रोख अनुदान

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

शासन निर्णय क्र. एलआयसी-१३११ / प्र.क्र.१३० / पापु-०४
मंत्रालय, मुंबई :- ४०० ०३२.
दिनांक :- ३१ मे, २०११.

**संदर्भ :-** १) शासन निर्णय, ग्राम विकास विभाग, क्रमांक - एलआयसी-१०८७ / सीआर-५४४ / ५९, दिनांक :- २ मे, १९८९.
२) शुध्दीपत्रक क्रमांक - एलआयसी-१०८७ / सीआर-५४४ / ५९, दिनांक :- १९ ऑक्टोंबर, १९८९.
३) शासन निर्णय, पा. पु. व स्व. वि. क्र. एलआयसी-१४११/प्र.क्र.८३/पापु-०४, दि.२६.४.२०११.

**प्रस्तावना**

ग्रामीण नळ पाणी पुरवठा योजनांकरिता भारतीय आयुर्विमा महामंडळाकडून वर्ष २००१-२००२ अखेरपर्यंत जिल्हा परिषदांना मंजूर झालेल्या कर्जाच्या दि. १ जून, २०११ रोजी परतफेडीसाठी देय झालेल्या आयुर्विमा महामंडळाच्या कर्जाच्या हप्त्यापोटी, मुद्दल रु. ९,२८,७९,२६६/- आणि व्याज रु. ७,०७,८५,५५४/- असे एकूण रक्कम रु. १६,३६,६४,८२०/- ( रु. सोळा कोटी छत्तीस लाख चौसष्ठ हजार आठशे वीस फक्त ) भारतीय आयुर्विमा महामंडळाकडे भरणा करण्याकरिता संदर्भात नमूद केलेल्या दि. २ मे, १९८९ रोजीच्या शासन निर्णयाप्रमाणे महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास रोख अनुदान मंजूर करावयाचे आहे.

**शासन निर्णय**

सन २०११-२०१२ या आर्थिक वर्षात भारतीय आयुर्विमा महामंडळाकडील कर्जाचे परतफेडीसाठी रु. २५९४.४० लाख इतकी तरतूद करण्यात आली आहे. त्यापैकी मे महिन्यासाठी रु. १६,३७,२३,०००/- इतकी रक्कम लेखानुदानाद्वारे उपलब्ध झालेली आहे. तथापी दि. १ जून, २०११ रोजी परतफेडीसाठी देय झालेले मुद्दल रु.९,२८,७९,२६६/- आणि व्याज रु. ७,०७,८५,५५४/- असे एकूण रक्कम रु. १६,३६,६४,८२०/- ( रु. सोळा कोटी छत्तीस लाख चौसष्ठ हजार आठशे वीस फक्त ) एवढे रोख अनुदान सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांना मंजूर करीत आहे. हे अनुदान अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई येथून दि. ३१ मे, २०११ रोजी देय होईल.

२. हे अनुदान कोषागारातून प्राप्त करण्यासाठी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या श्री. शं. धे. चव्हाण, वित्तीय सल्लागार व मुख्य लेखा अधिकारी यांच्या स्वाक्षरीने तयार केलेले व श्री. दु. र. चंद्रिकापुरे, उप सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांनी प्रतीस्वाक्षरीत केलेले देयक, अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांस सादर करावे. ही मंजूर रक्कम दि. १ जून, २०११ रोजी भारतीय आयुर्विमा महामंडळास भरणा करण्याची जबाबदारी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाची आहे. **सदर रक्कम इसीएस प्रणालीद्वारे महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई यांच्या खाती जमा करण्यात यावी.**

३. शासन परिपत्रक ग्राम विकास विभाग क्र. आरसीएन- १०८९ / सीआर- ३०२७ / २८, दिनांक :- ५ सप्टेंबर, १९९० मधील सूचना प्रमाणे अनुदानाच्या खर्चाचा महालेखापालांच्या मुंबई कार्यालयातील नोंदलेल्या खर्चाशी मेळ घालावा व ताळमेळाचे विहीत अहवाल शासनाकडे पाठवावे.

४. या शासन निर्णयाद्वारे मंजूर करण्यात आलेले अनुदान रु. १६,३६,६४,८२०/- (रु. सोळा कोटी छत्तीस लाख चौसष्ठ हजार आठशे वीस फक्त) चा खर्च पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग - मागणी क्र. वाय - २ - लेखाशीर्ष " २२१५, पाणी पुरवठा व स्वच्छता - ०१ पाणी पुरवठा - १०२ - ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम - स्थानिक क्षेत्र -(०१) (०१) ग्रामीण पिण्याचे पाणी पुरवठा योजनांकरिता आयुर्विमा महामंडळाकडून घेतलेल्या कर्जाच्या देय रकमांच्या परतफेडीबाबतचा खर्च भागविण्यासाठी जिल्हा परिषदांना अनुदाने ( २२१५ ११७३ ) ३१, सहाय्यक अनुदाने " (वेतनेतर) या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकावा आणि त्या खाली सन- २०११-२०१२ वर्षाकरीता उपलब्ध योजनेतर तरतूदीतून हा खर्च भागवावा.

५. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२२४/व्यय-३,दि. २६ मे २०११ अन्वये त्यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईट्वर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्यांच्या संगणक संकेतांक-२०११०५३११६१११११००१ आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

सही /-

**( उ. म. मदन )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, एक्सप्रेस टावर्स, ४था मजला, मुंबई-४०० ०२१.
२. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद ( सर्व ).
३. वित्तीय सल्लागार व मुख्य लेखाधिकारी, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन, नवी मुंबई.
४. अधिक्षक अभियंता, ( सीपीडीएम ) महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन, नवी मुंबई.
५. महालेखापाल, महाराष्ट्र - १ / २ , मुंबई / नागपूर ( लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता ).
६. निवासी लेखाधिकारी, मुंबई - ४०० ०२१.
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांनी दिनांक :- ३१ मे, २०११ पर्यंत महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास धनादेश देण्याची व्यवस्था करावी या विनंतीसह.
८. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, महाराष्ट्र राज्य, कोकण भवन, नवी मुंबई.
९. कार्यकारी अभियंता, पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, ( सर्व ),
१०. उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नाशिक, पुणे, औरंगाबाद, अमरावती व नागपूर.
११. वित्त विभाग, ( व्यय-३ / अर्थोपाय ) मंत्रालय, मुंबई - ४०००३२.
१२. पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील कार्यासने क्र. पापु-२०.
१३. निवड नस्ती ( का. क्र. पापु-०४ ), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.